**महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोगावरील**
**<u>पदाना मुदतवाढ देणेबाबत</u>**

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक :-सीबीसी-१०/२००६/प्र.क्र ५७६/मावक-५,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई -३२.
दिनांक : २० जुलै , २००९

वाचा :- १) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
क्रमांक - रामाआ -००३/प्र.क्र.१७५/मावक-१, दिनांक : १ मार्च, २००५
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
क्रमांक - सीबीसी-१०/२००६/प्र.क्र.५७६/मावक-५,
दिनांक : २ डिसेंबर , २००६
३) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
क्रमांक - सीबीसी-१०/२००६/प्र.क्र.५७६/मावक-५,
दिनांक : २३ मार्च , २००९
४) शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग ,
क्रमांक :-सीबीसी-१०/२००८/प्र.क्र.३३/मावक-५,
दिनांक : १ जुलै , २००९

**<u>प्रस्तावना</u> :-** अनुसूचित जाती जमाती समाजाच्या मागण्यांच्या अनुषंगाने या समाजाच्या सध्याच्या सामाजिक, शैक्षणिक, आर्थिक व सांस्कृतिक राजकीय वगैरे सद्यःस्थितीचा अभ्यास करण्याकरिता व त्यानुसार शासनास उपाययोजना सुचविण्यासाठी दिनांक १ मार्च, २००५ च्या शासन निर्णयान्वये "अनुसूचित जाती / जमाती आयोग " गठीत करण्यात आलेला आहे. सदर आयोगाची तसेच अध्यक्ष यांची मुदत दिनांक ३० जून, २००९ रोजी संपुष्टात येणार होती. तथापी, सदर आयोगामार्फत शासनास काही अहवाल सादर करावयाचे असल्याने सदर आयोगास उपरोक्त क्रमांक ४ अन्वये पुढील आदेश होई पर्यन्त मुदतवाढ देण्यात आलेली आहे .त्यास अनुसरुन आयोगाच्या पदांना सुध्दा मुदतवाढ देणे क्रमप्राप्त आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-** राज्य अनुसूचित जाती / जमाती आयोगाकरीता अधिकारी / कर्मचारी वर्गांची मंजूर ५३ पदापैकी विवरणपत्रात दर्शविलेली २७ पदे प्रथम टप्यात भरण्यास दिनांक २ डिसेंबर, २००६ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. सदर एकूण २७ अस्थायी पदे दिनांक १-३-२००९ ते दिनांक ३०-०६-२००९ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास उपरोक्त अनु.क्र.३ येथे नमूद केलेल्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली होती. आता या शासन निर्णयान्वये सदर आयोगावरील २७ अस्थायी पदांना दि. १-७-२००९ ते दि. २८-२-२०१० पर्यंत किंवा शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत, यापैकी जे आधि घडेल तेथपर्यंत, पुढे चालू ठेवण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

(कृ.मा.प.)

३. या पदावरील खर्च, " मागणी क्रमांक एन-३,
२२२५-अनुसूचित जाती अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण,
०१ अनुसूचित जातीचे कल्याण,
८०० इतर खर्च
(०१) (०३) महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती आयोग (२२२५-४०७-१) , "

या लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात येऊन त्या खाली सन २००९-२०१० या वर्षाकरीता मंजूर करण्यात येणाऱ्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. हे आदेश वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक : असेक-१००४/प्र.क्र.१२ (भाग-२)/२००४ / वित्तिय सुधारणा-१, दिनांक ४-१०-२००४ मधील तरतूदीच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर **www.maharashtra.gov.in** उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक संकेतांक **२००९०७२०१७४४४२००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( व.दा.राठोड)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,
अध्यक्ष / उपाध्यक्षक, महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोग, प्रशासकीय इमारत, पहिला मजला, डेअरी विभाग, वरळी सी फेस, मुंबई ४०० ०१८.
सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोग, प्रशासकीय इमारत, पहिला मजला, डेअरी विभाग, वरळी सी फेस, मुंबई ४०० ०१८.
वरिष्ठ संशोधन अधिकारी, महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोग, प्रशासकीय इमारत, पहिला मजला, डेअरी विभाग, वरळी सी फेस, मुंबई ४०० ०१८.
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, लेखा परीक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
अधिदान व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे.
विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी, मुंबई शहर, मुंबई.
वित्त विभाग (व्यय १४), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
सह संचालक, लेखा आणि कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
अवर सचिव (अर्थसंकल्प), सा.न्या. व वि.स. विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, का- मावक-५

# विवरणपत्र

शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
क्रमांक - सीबीसी-१०/२००६/प्र.क्र.५७६/मावक-५,
दिनांक : २० जुलै, २००९

| अ.क्र. | पदनाम | पदांची संख्या (अस्थायी) | वेतनश्रेणी (रूपये) |
|---|---|---|---|
| १ | सदस्य सचिव (सह सचिव दर्जा) | १ | १४३००-१८३०० |
| २ | सह संचालक (उप सचिव दर्जा) | १ | १२०००-१६५०० |
| ३ | अतिरिक्त पोलीस अधिक्षक | १ | १२०००-१६५०० |
| ४ | वरिष्ठ संशोधन अधिकारी | १ | १००००-१५२०० |
| ५ | पोलीस निरीक्षक | २ | ७४५०-११०५० |
| ६ | स्वीय सहायक | १ | ७४५०-११०५० |
| ७ | संशोधन सहायक | २ | ५५००-९००० |
| ८ | लघुलेखक उच्चश्रेणी | २ | ६५००-१०५०० |
| ९ | कार्यालयीन अधिक्षक | १ | ५५००-९००० |
| १० | सांख्यिकी अधिकारी | १ | ६५००-१०५०० |
| ११ | सहाय्यक लेखा अधिकारी | १ | ५५००-९००० |
| १२ | सहाय्यक विधी | १ | ५५००-९००० |
| १३ | लघुलेखक (क) | १ | ५५००-९००० |
| १४ | वरीष्ठ सहाय्यक | २ | ४०००-६००० |
| १५ | लिपीक टंकलेखक | २ | ३०५०-४५९० |
| १६ | बिल लिपीक | १ | ३०५०-४५९० |
| १७ | वाहन चालक (कंत्राटी) | २ | ४,००० |
| १८ | शिपाई | ४ | २५५०-३२०० |
| | **एकूण** | २७ | |

---------